पोलीस मुख्यालयाच्या सशस्त्र शाखेत काम करणाऱ्या पोलीस नाईक पदावरील कर्मचाऱ्यांना रायफल भत्ता अदा करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग,
शासन निर्णय, गृह विभाग क्र.पीएए ०३०३/सीआर-५४६/पोल-५अ,
मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक २० जुलै, २००४.

वाचा: १) पोलीस महासंचालकांचे क्र. पोमसं/३०/हत्यारभत्ता/२००४, दि.६.३.२००४ चे पत्र.
२) पोलीस आयुक्त, मुंबई यांचे प.क्र. पोआ/कक्ष-२/५५/०४, दि. २३.२.२००४.
३) शासन पत्र क्र.बीजीटी १००४/नवीन बाब/२००४-२००५/बीयुडी-१, दि. २.७.२००४.
४) शासन पत्र क्र.बीजीटी १००४/२०५५/२००४-२००५/बीयुडी-१, दि. ८.७.२००४

शासन निर्णय :- महाराष्ट्र राज्य पोलीस दलामध्ये पोलीस नाईक हा संवर्ग शासन निर्णय क्र.पीएए ०३९१/सीआर-२७२/पोल-५अ, दि.४.११.१९९२ अन्वये दि.१.११.९२ पासून निर्माण करण्यात आला आहे. सशस्त्र पोलीस दलातील पोलीस शिपाई व पोलीस हवालदार यांना अनुक्रमे रु.८०/- दरमहा व रुपये १००/- दरमहा रायफल भत्ता अदा करण्यात येतो.

सशस्त्र पोलीस दलातील पोलीस शिपाई आणि हवालदार यांच्या सारखेच पोलीस नाईक हे कर्तव्य करीत असले तरी त्यांना रायफल भत्ता मिळत नाही. शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, पोलीस मुख्यालयातील सशस्त्र शाखेत काम करणाऱ्या पोलीस नाईक पदावरील कर्मचाऱ्यांना दि.१ एप्रिल, २००४ पासून रु.८०/- दरमहा या दराने रायफल भत्ता देण्यात यावा.

२. यासाठी होणारा खर्च " २०५५ पोलीस १०८ राज्य मुख्यालय पोलीस ०(१) शहर पोलीस (०२)(०१) आस्थापना (२०५५००९७) " " २०५५ पोलीस १०९ जिल्हा पोलीस (००)(०१) जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८)" या मुख्यलेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००४-२००५ या आर्थिक वर्षात अतिरिक्त अर्थसंकल्पासह मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यास यावा.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर-२७७/०४/व्यय-७, दि. ७.५.२०००४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

४. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि.शं. धुमाळे )
सह सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक , महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस महासंचालक , अे.सी.बी., मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुप्तवार्ता), महाराष्ट्र राज्य, मुंबई
विशेष पोलीस महानिरीक्षक, गुन्हा अन्वेषण विभाग (गुन्हे ), महाराष्ट्र राज्य, मुंबई

अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), मुंबई,
संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक,
सर्व पोलीस उपमहानिरीक्षक
सर्व पोलीस आयुक्त/ सर्व पोलीस अधिक्षक,
सर्व प्राचार्य, प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण शाळा,
सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१ ते१०,
प्राचार्य गुन्हा अन्वेषण प्रशिक्षण शाहा, नाशिक,
महालेखापाल (लेखापरिक्षा) -१महाराष्ट्र , मुंबई
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, व्यय-७, मंत्रालय, मुंबई- ३२.
उ.स., बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
निवडनस्ती पोल-५अ